नक्षलग्रस्त भागाच्या जलद विकासासाठी विशेष कृती कार्यक्रमांतर्गत राज्य स्तरावर तसेच विभागीय आयुक्त, नागपूर स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : नविका-२४१८/१६२७/प्र.क्र.१४९/का-१४१७**

मंत्रालय, मुंबई - ३२

दिनांक : ०६ मार्च, २०२३

वाचा : १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक इपीडी-२५१०/प्र.क्र.२९४/का-१४२१, दिनांक २२ जुलै, २०१० व दिनांक १८ ऑगस्ट, २०१०

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक नविका-२४१८/१६२७/प्र.क्र.१४८/का-१४१७, दिनांक २२ सप्टेंबर, २०२२

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३

**प्रस्तावना :**

नक्षलग्रस्त भागाच्या जलद विकासासाठी विशेष कृती आराखडा तसेच पूरक आराखड्याच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी विभागीय आयुक्त, नागपूर यांचे स्तरावर ३ पदे (उप संचालक-१, संशोधन अधिकारी-१ व सांख्यिकी सहायक-१) व राज्यस्तरावर ३ पदे (उप सचिव-१, संशोधन अधिकारी-१ व लिपिक टंकलेखक- १) अशी एकूण ६ पदे शासन निर्णय क्र.: इपीडी-२५१०/ प्र.क्र.२९४/का-१४२१, दि. २२ जुलै, २०१० व समक्रमांकाचे पूरकपत्र दि. १८ ऑगस्ट, २०१० अन्वये निर्माण करण्यात आली आहेत. संदर्भाधीन शासन निर्णय क्र.: नविका-२४१८/१६२७/ प्र.क्र.१४८/ का-१४१७, दि.२२ सप्टेंबर, २०२२ अन्वये अस्थायी पदांना दि.१ सप्टेंबर, २०२२ ते दि.२८ फेब्रुवारी, २०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती. सदर पदांना दि.१ मार्च, २०२३ पासून पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नक्षलग्रस्त भागाच्या जलद विकासासाठी विशेष कृती कार्यक्रम तसेच पूरक कार्यक्रमांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे नमूद विभागीय आयुक्त, नागपूर यांचे स्तरावर निर्माण

करण्यात आलेल्या ३ व राज्यस्तरावर निर्माण करण्यात आलेल्या ३ अशा एकूण ६ अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०२३ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

राज्यस्तरावर निर्माण करण्यात आलेली पदे

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी | पदाची संख्या |
|---|---|---|---|
| १ | उप सचिव | S-२५ : ७८८००-२०९२०० | १ |
| २ | संशोधन अधिकारी | S-१५ : ४१८००- १३२३०० | १ |
| ३ | लिपिक टंकलेखक | S-६ : १९९००-६३२०० | १ |
| | **एकूण** | | **३** |

विभागीय आयुक्त, नागपूर यांचे स्तरावर निर्माण करण्यात आलेली पदे

| अ.क्र. | पदाचे नाव | वेतनश्रेणी | पदाची संख्या |
|---|---|---|---|
| १ | उप संचालक | S-२० : ५६१००- १७७५०० | १ |
| २ | संशोधन अधिकारी | S-१५ : ४१८००- १३२३०० | १ |
| ३ | सांख्यिकी सहायक | S-१० : २९२००- ९२३०० | १ |
| | **एकूण** | | **३** |

२. नियोजन विभागातील राज्यस्तरावर निर्माण करण्यात आलेल्या ३ पदांच्या वेतनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) (०१) नियोजन विभाग, योजनेतर (३४५१ ०१८२) (दत्तमत), ०१ वेतन या लेखाशिर्षाखाली तसेच विभागीय आयुक्त, नागपूर यांचे स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या पदांसाठी होणारा खर्च मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०२) राज्य नियोजन यंत्रणेत वाढ करणे (०२) (०१) विभागीय आयुक्तांचे कार्यालय, नियोजन कक्ष योजनेतर (३४५१ ०३४२) (दत्तमत), ०१ वेतन या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध करून दिलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** वित्त विभाग, शासन निर्णय क्र.: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८ फेब्रुवारी, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**४.** महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०६१५३६५०४३१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJENDRA PANDURANG WAGH

Digitally signed by RAJENDRA PANDURANG WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=9e4468a63fe9f9f2a565a0790f46e3c14a3715b2370430433845720a9c4c8107, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7ADB1868A49B8719E27D3453044671A8CEDDBD04AF26DD2089ED03E6B1BD92BD, cn=RAJENDRA PANDURANG WAGH
Date: 2023.03.06 15:41:01 +05'30'

**( राजेंद्र वाघ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
२. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
३. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
४. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा
५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचलनालय, मुंबई
६. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकरी, नागपूर
१०.कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग (का-१४२१/का-१४२२/का-१४२४), मंत्रालय, मुंबई
११.वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१६ / व्यय-८ / अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२
१२.निवड नस्ती (का-१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.